# पवार कुलभूषण राजा भोज



**डॉ.ज्ञानेश्वर टेंभरे**
**पूर्व प्राध्यापक विभागप्रमुख, अधिष्ठाता**
**रा.तु.म. नागपूर विद्यापीठ,नागपूर.**

मालव चक्रवर्ती सम्राट भोज मध्ययुगीन भारताच्या इतिहासामध्ये सम्राट अशोक व विक्रमादित्य यासारख्या महाप्रतापी, शूरवीर, शासनकर्ते, विद्वान कवी, दानी, ज्ञानी, न्यायी, धार्मिक, सदाचारी, विद्वानांचा आश्रयदाता, ज्ञान—विज्ञान, कला, साहित्य, संस्कृतीचा पुरस्कर्ता तसेच लोकांच्या सुखसमृद्धीसाठी सदैव कार्यरत, सुरक्षा दक्ष व प्रजेमध्ये अतिशय लोकप्रिय, अद्वितीय आदर्श चक्रवर्ती राजा झाला.

भोज हे एक महान व्यक्तीमत्त्वाचे बलाढ्य धनी होते की त्यामुळे त्यांना अनेक पदव्यांनी अलंकृत केले गेले होते. जसे — महाधिराज परमेश्वर परम भट्टारक महाधिराज परमेश्वर, मालवमण्डन, सार्वभौम मालवचक्रवर्ती, अवन्तिनायक, धारेश्वर, निवार्णनारायण, त्रिभुवननारायण, लोकनारायण, विदर्भराज, अहिराज, अहिंद्र, अभिनवार्जुन, कृष्ण, रणरंगमल्ल, आदित्यप्रताप, चाणक्यमाणिक्य, कविराज, इत्यादी. जवळ जवळ ८४ पदव्यांचा डॉ. श्री. वेंकटाचलम यांनी धार स्टेटच्या गॅझेटमध्ये पृष्ठ क्र.१०७ वर उल्लेख केलेला आहे. भारताचे प्रथम पंतप्रधान स्व.श्री. पंडित जवाहरलाल नेहरू यांनी आपल्या जगप्रसिद्ध रचना “डिस्कवरी ऑफ इंडिया” मध्ये धाराशीष राजा भोज यांना मध्ययुगीन भारताचा महानायक म्हणून गौरविले आहे.

**१) भोज चा वंश —** राजा भोज यांनी प्राचीन अग्नीकुल राजपूत क्षत्रिय पवार/परमार वंशात जन्म घेऊन ते मालवा चे सार्वभौम राजे बनले ह्यांची सत्यता तत्कालीन ताम्रपत्र, अभिलेख व ग्रंथांमधून स्पष्ट होते.

**उदा. १.** उदयादित्यकालीन नीलकंठेश्वर मंदिर, उदयपूर (जि.विदिशा म.प्र.) च्या अभिलेखावरून स्पष्टपणे माहित होते की राजाभोज हे पवार वंशाचे होते.

**श्रीमान पवार वंश्यो नृपनिंच विवुध मालव राज्य ।**
**कित्वा विदात शुरवीर भवंतिजल मिदैन पापिनां भूषरहा।।**

**अर्थात्—** श्रीमान पवार वंशामध्ये अनेक विद्वान व शूरवीर राजे झाले ज्यांनी मालव राज्यातून पापी लोकांचा संहार केला.

**उदा.२.** जयवर्धनकालीन मांधाता (जि.खंडवा म.प्र.) यातील अभिलेखामध्ये वर्णन केले गेले आहे की,

**पंवार वस्यो परमारकुलेत्तस: कंसाजिन्महिमा नृप:।**
**श्री भोजदेव इत्यासीन्नासीरकान्त भूतल: ।।५।।**

**अर्थात् —** पवार वंशाच्या परमार कुळामध्ये सर्वोत्कृष्ट कंसाला जिंकणारा महिमावान राजा श्री भोजदेव झाला. ज्याने पृथ्वीवर चारही दिशांमध्ये विजय मिळवला.

**२. राजा भोज चा जन्म व राज्यवैभव**— राजा भोज यांना भोज, भोजदेव, भोजराज, भोजपती, नरेंद्र इत्यादी नावांनी संबोधित केले गेले आहे. पं. राजवल्लभ लिखित 'भोजचरित्र' यात भोज चा जन्म माघ शुक्ल ५ (वसंतपंचमी) ला संवत १०३७ (ई.सा.९८०) झाल्याचे दर्शविले आहे. तो वडील मालवाधीश सिंधुलराजदेव व आई महाराणी सावित्री यांचा मोठा (थोरला) मुलगा होता. तसेच वाक्पती मुंजदेव यांचा पुतण्या होता. रत्नावली व शशीप्रभा या भोजच्या सावत्र आई होत्या. भोजच्या लहान भावाचे नाव दुशल किंवा उत्पलदेव होते. जो नंतर किराड राज्याचा स्वतंत्र राजा झाला. तसेच दुसरा सावत्र भाऊ उदयादत्त हा उदयपुर (विदिशाजवळ जि. ग्वालियर) चा राजा झाला. भोजची पत्नी महाराणी लीलावती तसेच दुसऱ्या पत्न्या सत्यवती, मदनमंजीरी, भानुमती, पिंगळा, समुद्रा, इ. होत्या. भोज चे तीन मुले होते, जयसिंह, देवराज व वत्सराज आणि दोन मुली राजमती व भानुमती होत्या. भोजची पत्नी महाराणी लीलावती महान कवयित्री व गणितज्ञ होती. तसेच राजदरभाबात महाकवी कालिदास यांच्याशी अनेक वेळा शास्त्रार्थ वादविवादामध्ये जिंकलेली होती.

भोज हा सर्वप्रकारच्या शस्त्रात व शास्त्रांमध्ये निपुण होता. त्याने राजा मुंजदेव (काका) तसेच राजा सिंधुलराजदेव (वडील) यांच्या काळात शुरवीर लढवय्या व विद्वान कवी म्हणून प्रसिद्धी मिळवली होती. एकदा महाराज मुंज यांच्या दरबारात एक ज्योतिषी आला व त्याने भोजची जन्मकुंडली पाहून सांगितले की हे राजा ऐक **''पंच्च्याशतपंचवर्षाणि सप्त मास दिनत्रयम् । भोजराजेन भोक्तव्या सगौडो दक्षिणपथः।।''**

**अर्थात्—** ५५ वर्ष ७ महिने ३ दिवस गौड बंगाल सहित दक्षिणेचे राज्य भोजराजा उपभोगेल.

मुंजदेवच्या मृत्युनंतर सिंधुलराज मालवा चा राजा झाला. राजा सिंधुलदेवराज यांनी आपल्या वृद्धापकाळामुळे आपले राजसिंहासन आपल्या हुशार थोरल्या मुलाला भोजदेवला देवून स्वतः तपस्या करायला जंगलात निघून गेला. त्यावेळी भोज फक्त २० वर्षाचा किशोर होता. इतिहासकाराच्या माहितीनुसार भोज मालवाच्या राजसिंहासनावर मार्गशीर्ष वद्य १०, संवत १०५६ (इ.स.१०००) या दिवशी आरूढझाला.

सुरुवातीला राजा भोज यांना आपल्याच कुटूंबातील भाऊबंद शत्रुंशी संघर्ष करावा लागला. मुंजदेव चे दोन्ही मुले आबू व जालौर चे स्वतंत्र राजे झाल्यानंतर भोज यांनी चेदीश्वर, इंद्रस्थ, भीम, तोग्गल, चालुक्य, कर्णाट, लाट, तुरूक, गांगयदेव, इत्यादी अनेक राज्यांना युद्धात पराभूत करून मालवा राज्याच्या सीमांना चारही दिशांमध्ये विस्थापित केले. आपली राजधानी उज्जैन मधून धारानगरी ला स्थलांतरीत केली.

**३. राजा भोज ची विजयी मोहिम —** राजा भोज सिंहासनावर आरूढ होताक्षणिच कल्याणीच्या चालुक्यांशी प्रतिशोध घेण्यासाठी सज्ज झाले. राजा भोज यांनी कल्याणीवर आक्रमण केले. या युद्धात कलचुरीचे शासक गांगेयदेव व दक्षिणेतील चोल राजा राजेन्द्र यांनी भोज यांना साथ दिली. कल्याणीच्या चालुक्यावर विजय हा राजा भोज यांचा पहिला विजय व पहिली सैनिक मोहीम होती.

कोंकण व लाट प्रदेशावर चालुक्यांच्या सामंताचे आधिपत्य होते. म्हणून राजा भोज ची दुसरी सैनिकी मोहिम कोंकण व लाट प्रदेशासाठी झाली. येथे सुद्धा राजा भोज यांना विजयश्री मिळाली. लाट प्रदेशात राजा भोज यांनी आपले सामंत यशोवर्मा यांना पदभार दिला. राजा भोज यांनी आदीनगर (उडीसा) चे सोमवंशी राजा इन्द्रस्थ यांना पराभूत करून त्याला आपल्या अधीन केले.

राजनीतीतील नाते हे जास्त काळ टिकणारे नसतात. मित्रता व शत्रुता ही खाजगी नफा नुकसान व स्वार्थाने बदलत रहातात. दक्षिणेतील विजय यात्रेत कलचुरी चे शासक गांगेयदेव ने भोज यांना साथ दिली होती. परंतु भोज यांनी कलचुरी शासक गांगेयदेव यांच्या चेदीप्रदेशावर सुद्धा आक्रमण केले. सुरवातीलाच राजा भोज ने कलचुरी राजावर आक्रमण करून त्याची शक्ती कमी केली. विजयाने भोज ची साथ दिली. या लढाईनंतर **"कुठे राजा भोज व कुठे गांगेय तैलप"** ही म्हण प्रसिद्ध झाली.

कन्नोज ला जवळ असलेल्या क्षेत्रांवर साम्राज्य स्थापित करण्यासाठी राजा भोज अधिकच उत्सुक होते. चंदेल सत्तेच्या पराभवाबरोबरच ग्वाल्हेर चे कछवाह सामन्त यांनी चंदेल सत्तेची सामंती सोडून भोज यांची सामन्ती स्वीकारली. भोज यांच्यासाठी कन्नोजच्या वाटा मोकळ्या झाल्या. योग्य वेळ पाहून भोज यांनी कन्नोजवर आक्रमण केले आणि ते कान्यकुब्ज च्या काही क्षेत्रांवर आपले साम्राज्य स्थापीत करण्यात यशस्वी झाले. यासोबतच उत्तर प्रदेशातील काही वेगळ्या क्षेत्रांवर भोज यांनी आपली सत्ता प्रस्थापित केली.

भोज यांची शेवटची सैनिकी मोहिम अनहिलवाडा चे चालुक्य भीम यांच्या विरुद्ध झाली. तसेच भीम व भोज यांच्यात मित्रता होती. परंतु भोज यांनी मित्रतेकडे दुर्लक्ष करून अनहिलवाडा वर त्यावेळी आक्रमण केले की जेव्हा भीम दुसऱ्या सैनिकी मोहिमेसाठी आपल्या राजधानीच्या बाहेर होता आणि या सैनिकी मोहिमेचे नेतृत्व भोज यांनी केले नाही तर त्यांचे सेनापती कुलचंद्र यांनी केले होते. भीमच्या अनुपस्थितीत त्याची राजधानी असुरक्षित झाली होती. त्यामुळे मोठ्या सहजतेने मालवा च्या सेनेने त्यांना खूप लुटले व उध्वस्त केले आणि कुलचंद्रची लुट ही एक दंतकथा झाली. भीम यांनी सक्षम असतांनाही प्रतिशोध घेण्यासाठी कोणतेही अनुचित कार्य केले नाही.

**४. भोजचे साम्राज्य —** शेवटी भोजचा विक्रम संवत १०७८ (इ.स.१० २१) मध्ये फक्त २० वर्षांनंतर वयाच्या ४०—४१वर्षातच **"मालवाधिश परमभट्टारक महाराजाधिराज परमेश्वर त्रिभूवन चक्रवर्ती"** या सर्वोच्च सार्वभौम पदावर राज्याभिषेक झाला. (शुभशिल भोज प्रबंध) भोज यांनी आपले सेनापती कुलचंद्र व सुरादित्य यांच्यासोबत आपल्या राज्याची सीमा उत्तरेकडे हिमालय (काश्मिर) दक्षिणेत मलय (केरळ) पश्चिमेकडे द्वारका व पूर्वेकडे बंगाल पर्यंत विस्तारित केली. (अवंतीका शिलालेख) पी. टी. श्रीनिवास अय्यंगार प्रमाणे भोज चे राज्य गोदावरी व यमुनेपर्यंत तसेच डी.सी.गांगुली नुसार भोज चे राज्य उत्तरेत बांसवाडा, डुंगूरपूर पर्यंत दक्षिणेत गोदावरी पर्यंत तसेच पश्चिमेस कैरा जिल्ह्यापर्यंत पसरलेले होते. डॉ.दशरथ शर्मा यांच्यानुसार गुजरातचा अहमदाबादपर्यंतचा भाग, बस्तर भाग व महाराष्ट्राचे कोंकण, खानदेश व विदर्भ त्यांच्या राज्यात समाविष्ट होते. म्हणून भोज हे सार्वभौम चक्रवर्ती राजा होते. भोज मालव चक्रवर्ती झाले होते. त्यांनी अनेक छोट्या मोठ्या राज्यांना पराभूत करून आपल्या राज्याच्या सीमा वाढवल्या होत्या. प्रारंभी त्यांना राज्याच्या रूपात फक्त मालवा मिळवला होता. त्याला त्यांनी मोठ्या साम्राज्यात परिवर्तीत केले होते. ते ८४ सामंतांचे मांडलिक राजांचे स्वामी होते. त्यांनी ८४ पदव्या प्राप्त केल्या

होत्या. ८४ ग्रंथ लिहिले. धारमध्ये ८४ महाल, ८४ देवालय तसेच ८४ चौक व बाग बनवले. (श्रृंगारमंजीरीकथा)

**५. भोज विरुद्ध गजनी —** इतिहासकारांनुसार राजा भोज हा भारताचा पहिला हिन्दु राजा होता ज्याने विदेशी मुसलमान आक्रमण करणाऱ्यांना या देशात पाय रोवू दिले नाही. अफगानिस्तानच्या गजनी ने जेव्हा जेव्हा आक्रमण केले तेव्हा भोज यांनी त्यांना देशाच्या सीमेबाहेर हाकलून लावले.

सर्वप्रथम भोज यांनी वर्ष १००८ ई. मध्ये लाहौरचे राजे आनंदपाल यांना सुल्तान महमुद गजनीच्या आक्रमणाचा सामना करण्यासाठी आपले सैन्य पाठविले. त्याप्रमाणेच त्यांचे पुत्र राजे त्रिलोकपाल जो वर्ष १०१९ ईसवीमध्ये लाहोरचा शासक होता त्याला आपले सैन्य पाठविले व भोज ने गजनवीच्या आक्रमणांना परतवून लावले. (धार गॅझेट).

गर्दीजी लिखीत "जैनुल वर्तमानपत्र" च्या विवरणानुसार वर्ष १०२४—१०२६ ई. मध्ये महमुद गजनी ने भारतावर पुन्हा आक्रमण केले तो जैलसमेर, मारवाड, गुजरात या मार्गाने पुढे गेला. गुजरातचे चालुक्य राजा भीम प्रथमचे सैन्यबळ गजनीच्या सैन्यबळासमोर टिकाव धरू शकले नाही व त्याने सोमनाथ मंदिराची तोडफोड करून खूप लूटपाट केली. परंतु राजा भोजच्या विशालसेनेची माहिती मिळताच तो सिंधच्या वाटेने वाळवंटाच्या मार्गाने परत अफगाणिस्तानला गेला. त्याला परत जातांना आपली सेना व प्राण्यांची फार मोठी प्राणहानी सहन करावी लागली. लगेच राजा भोज यांनी सोमनाथ मंदिराची जीर्णोद्धार केले.

ल्युअर्ड व लेले लिखित "दी परमाराज ऑफ धार अँड मांडू" यात अशी माहिती मिळते की राजा भोज यांनी महमुद गजनीच्या आक्रमणांचा सामना करण्याच्या उद्देशाने हिन्दू राज्यांचा एक सशक्त संघ बनवला. ज्यात कलचुरी नरेश लक्ष्मीकर्मा व चौहान इत्यादि राजपूत वंशीय नृपतीगण सम्मिलीत होते. "फरिश्ता" मध्ये या संघाच्या संयुक्त सेनेमध्ये अजमेर, कन्नोज, कालिजर, लाहौर, इत्यादि. राज्यांच्या सेना सम्मिलित असल्याचे सांगितले आहे जेणे करून लाहौर नरेश जयपाल आक्रमण करणाऱ्या गजनीला मात देवू शकेल.

ए.इ.खंड ३, पृष्ठ ४६ वर उल्लेख मिळतो की जेव्हा महमुद गजनी चा मुलगा मलिक सलाल मसूद ने इ.स. १०४३ मध्ये लाहौर वर आक्रमण केले तेव्हा राजा भोजच्या नेतृत्वाखाली हिंदू राज्यांच्या संयुक्त सेनेने बहराइच च्या मैदानावर एक महिन्यापर्यंत घनघोर युद्ध केले आणि त्याला परत अफगाण हाकलले. त्यानंतर संयुक्त सेनेने हांसी, थानेश्वर,नागरकोट, इत्यादी किल्यांना मुसलमानांपासून स्वतंत्र केले. गजनीचे सेनापती तोग्गल पासून लाहौरचा किल्ला मुक्त करण्यासाठी राजा भोज ने लगातार सात महिन्यापर्यंत युद्ध करून शेवटी विजय मिळविला.

**६. भोज चे महान व्यक्तीत्व व कर्तृत्व —** शृंगारमंजिरीकथा यात भोज ने आपल्या व्यक्तीत्वाचा परिचय दिला आहे. भोज सुवर्णमय कांतीवाला, उंच, भीमभुजाधारी, अतिशय सुंदर चेहरा, उंच कपाळ, विशाल वक्षाचा, महापराक्रमी, आकर्षक व्यक्तीमत्त्वाचा मालक होता.

**कनककांतीच्युरितमरकतप्रभाभिरामदेहः ।**
**निजभुजोघालितदुमेदरिपू ।**
**सतताविकृतसुदर्शनोपि दुर्दशनः लावण्यपीयुसलिलाः।**
**हराट्टहास इवं विसाद्कांतिसम्पदः अभूत प्रसवभूमि।**

**अर्थात् —** सुवर्णप्रभामिश्रीत गव्हाळ वर्णाचे शरीर, प्रचंड शक्तीशाली भुजा ज्या शत्रुंना घाबरवतील अशा होत्या. राजा भोज ऋतु अनुसार वेगवेगळ्या फुलांचा लेप लावत असे. त्यांची धर्मावर खूप श्रद्धा होती ते स्त्रियां आणि लहान मुलांवर कधीही शस्त्र उगारत नसे. शरण आलेल्या शत्रुंना आश्रय देत असे. तो परस्त्रीयांचा सन्मान करत असे. तसेच त्यांच्यापासून नेहमी दूर रहात असे. तो शिव, जगनारायण, सरस्वती व कालीमातेचा उपासक होता.

तो धनुर्विद्या, असिधेनू (लांब चाकू किंवा सुरी) कृपाण व तलवार चालवण्यात तरबेज होता. त्याने 'खड़गशतम्' शास्त्र लिहीला होता. भोजला उन्मत्त हत्त्याला वशीभूत करण्याची कला व युक्ति अवगत होती. तो हत्त्याचे लक्षण, अश्वांचे गुण व त्यांची परीक्षा करण्यात निष्णांत होता. (युक्तीकल्पतरू, शालिहोत्र, कोदण्ड,काव्य) भोजदेव लिखित युक्तीकल्पतरू ग्रंथानुसार त्याचे तीन प्रकारे सैन्यदल होते. पायदळ सेना, अश्वसेना व हत्तीसेना. तो उत्तम पशु—चिकित्सक सुद्धा होता.

**यश्च प्रभणे धर्मस्य, आश्रयः सत्यस्य, कुलगृहं कलानाम क्षेतं क्षत्राचारस्य,**
**प्रमोदोदखनं, विद्यालतानाम् विधानं नीतेः जीवितं शौर्यस्य,वसतिर्विलास्तनामा,**
**आकरः करुणावा बान्धणे वैदगध्यस्य...रसस्य, धौरेयो. धनुर्धराणाम,**
**अग्रणी गुणवताम । ॠ.मं.क.पृ.९**

स्वतः भोज यांच्यात धर्म, सत्य, कला, क्षत्रिय विचार, विविध विद्या, नीती, शौर्य, विलास, करुणा रसिकता, धनुर्धरता इ. विविध गुणांचा समावेश होता. भोज हा उदार, शालीन व चांगल्या मनोवृत्तीचा आदर्श राजा होता. भारतीय आदर्शांचा तो प्रतिक होता. या सर्व गुणांमुळे त्यांनी लोकांमध्ये मोठ्या प्रमाणात प्रतिष्ठा प्राप्त होती.

राजा भोज हा सम्राट अशोकासारखा सदाचारी व सम्राट समुद्रगुप्तासारखा साहित्यिक तसेच सम्राट विक्रमादित्यासारखा शूरवीर व न्यायी राजा होता. जो नेहमी आपल्या प्रजेच्या सुखसमृद्धीसाठी समर्पित रहात असे. याप्रमाणे राजा भोज यांच्यामध्ये विविध गुणांचा समावेश होता.तो गुणवंतांमध्ये अग्रेसर होता. राजा भोज यांच्या कारकीर्दित मालवा अतिशय संपन्न होता. तो कविराज 'मालवा चक्रवर्ती' समजला जात असे. तसेच त्यांना आपण हिंदू भारताच्या महान राज्यांच्या रांगेत ठेवू शकतो. भोजच्या मृत्युनंतर श्री. बल्लाळ पंडित यांनी लिहिले आहे की —

**अद्य धारा,सदा धारा, सदा लम्बा सरस्वती ।**
**पंडिताः खंडिताः सर्वे भोजराजे दिवंगते ।।**

एका दंतकथेनुसार कवी कालिदास (भोजच्या दरबारातील महाकवी पं.छित्रप) हे नाराज होऊन धार सोडून मालवा बाहेर कुठेतरी निघून गेले. त्यांचा काहीच पत्ता लागत नव्हता तेव्हा राजा भोज यांनी स्वतःला मृत घोषित केले, की ज्यामुळे कालिदास परत यावेत. ही मृत्युची बातमी ऐकताच कालिदास ने वरील श्लोक म्हटले होते. नंतर ते धारला परत आल्यावर त्यांनी पाहीले की राजा भोज जीवंत आहेत. तेव्हा त्यांनी राजा भोजची प्रशंसा करीत खालील श्लोक म्हटला —

**अद्यधारा, सदाधारा, सदा, लम्बासरस्वती, पंडिताः मंडिताः सर्वे, भोजराजे भुवंगते।।**

भोज सर्व राज्यशास्त्र, ३६ शस्त्रविज्ञान, ७२ कलांमध्ये पारंगत होते. (प्रबंध चिंतामणी, राजमाला)

भोज यांना विविध कला व वैज्ञानिक ज्ञानाचे पांडित्य प्राप्त होते — असे यांचे अनेक ग्रंथ, उदा. युक्तीकल्पतरू, समरांगणसुत्रधार, सरस्वती कंठाभरण, श्रृंगारप्रकाश व श्रृंगारमंजीरीकथा यावरुन विशद होते. ते शृंगाररसात पारंगत होते. त्यांचे ग्रंथ विविध क्षेत्रामध्ये जसे ज्योतिष्य, अलंकार, दर्शन, राजनीती, धर्मशास्त्र, शिल्प, व्याकरण, वैद्यक, कोष, काव्य, सुभाषित, यामध्ये मिळतात. प्रभावति चरित्रानुसार भोजच्या लिखित शास्त्रांमध्ये व्याकरण, शब्दांलकारंशास्त्र, तर्कशास्त्र, चिकित्साशास्त्र, राजसिद्धांत, रसशास्त्र, वास्तुशास्त्र, उदयशास्त्र, अंकशास्त्र, शाकुनकशास्त्र, अध्यात्मशास्त्र, स्वप्नशास्त्र, सामुद्रीकशास्त्र, व्याख्यानशास्त्र, प्रश्नचुडामण्डन, पूर्वजन्म, अर्थशास्त्र, अर्थकाण्ड, मेघमाला, इत्यादी होते. कोदण्डकाव्य, भोजप्रबंध, श्रृंगारमंजीरीकथा याशिवाय नाट्यशास्त्र, संगीतशास्त्र, इत्यादींचा समावेश आहे. त्यांचे जगप्रसिद्ध ग्रंथ १. पंतजलियोग २. शब्दानुशासनकोष, ३. राजमृगांक वैद्यशास्त्र, ४. राजमृगांक—ज्योतिषशास्त्र, ५. मनुभाष्य—धर्मशास्त्र, ६. सरस्वती कंठाभरण (संस्कृत व्याकरणशास्त्र), १० युक्तिकल्पतरु (राजनीतिशास्त्र), ११. श्रृंगारमंजरी (कथासंग्रह), १२. प्रबंध चिंतामणी (इतिहास), १३. चम्पुरामायण १४. कुर्मशतक काव्य, १५. न्यायवार्तिक ई. ८४ ग्रंथ आहेत.

राजा भोज जवळजवळ १४०० विद्वानांचे आश्रयदाता होते. कोदण्डकाव्य व अज्ञातनामा काव्यात भोजच्या विद्वत परिषदेची माहिती आहे. त्यांच्या राजदरबारात विविध विषयांचे ५०० विद्वान होते. विविध प्रश्न समस्यांवर अभिमत, न्यायसंगत, तर्कसंकत निष्कर्ष मिळविण्यासाठी या विद्वानांचे मत घेतले जात असे. भोजने रामेश्वर, सोमनाथ, केदारनाथ, महाकाल मंदिरांचे जीर्णोद्धार केले होते. त्याने भोजपुरी झील (सरोवर) व भोजनाथ मंदिर बांधुन वर्तमान भोपाळ (भोजपुर) साापित केले होते.

कोणतेही नागरिक न घाबरता न्याय मिळविण्याचे अधिकारी होते. राजा भोज स्वत: वेष बदलवून राज्यात हेरगीरीकरत फिरत असत. वर्षभर विविध परिसंवाद, गोष्टी संगीत, नाटक राजाश्रयाने चालत असत. राजा भोजने धारमध्ये “भोजशाला” किंवा “सरस्वतीसदन” नावाचे विश्वविद्यालयतसेच उज्जैन व मांडू येथे विद्यालयांची स्थापना केली होती. येथे देश—परदेशातील विद्यार्थीविद्या प्राप्त करत होते. भोजचे प्रधानमंत्री रोहक व मंत्री बुद्धीसागर दोन्ही विद्वान होते. त्यांचा राजपुरोहित चंद्रशेखर दीक्षित होता. भोजच्या राजदरबारात महाकवी चक्रवर्ती पंडित छित्रप इतके विद्वान होते की त्यांना **‘कालिदास’** ही पदवी देऊन अलंकृत केले गेले होते. भोजच्या दुसऱ्या राजकवींमध्ये नयनंदी, माघ, धनपाल, वररूचि, सुबंधु, बाणा, अमर, मदन राजशेखर मयुर, दंशवल, इत्यादी होते. थोडक्यात भोज हे ब्रह्मक्षत्री राजा होते. ते शूर व पंडित सुद्धा होते.

**७. भोज चे वायुयान शास्त्र —** राजा भोज यांनी आपली जगप्रसिद्ध रचना ‘समरांगण सुत्र’ यात अनेक विज्ञानशास्त्रांचे वर्णन केलेले आहे. या ग्रंथात ‘वायुयानशास्त्र’ नावाचा ३१ क्रमांकाचा अध्याय आहे. या अध्यायाचा मुळ आधार महर्षि भारद्वाज लिखित “बृहद वायुयान विज्ञान” हा ग्रंथ आहे. राजा भोज ने या अध्यायाच्या रचनेसाठी ९७ संदर्भ ग्रंथांची यादी दिली आहे. त्यांनी ऋग्वेद, रामायण, महाभारत, इ. मध्ये वर्णन केलेले आकाशवाणी रथ, पुष्पक, शाल्व नावांच्या विमानांचे वर्णन दिले आहे. राजा भोज यांनी “पांचमिश्रलोह” धातूच्या वायुयान निर्माण करण्यासाठी उपयोग सांगीतला आहे. ज्यामुळे आकाशामध्ये वायुयानाला लेसर किरणांपासून नुकसान होणार नाही. ही सुरक्षा घेतली दिसते, याचप्रमाणे इंधनाच्या रूपानं पारा वापरल्याचे सांगितले आहे.

राजा भोज यांनी दिलेल्या वायुयान शास्त्राच्या माहितीच्या आधारावर मुंबईला राहणारे शिवशंकर बापूजी तळपदे यांनी वर्ष १८९५ मध्ये एका वायुयानाचे निर्माण केले व त्याला

'मरूत्सखा' नाव दिले या वायुयानाचे स्वत: वैमानिक बनून जवळजवळ १५०० फूट उंचावर विमान उडवले. तेव्हा मुंबईकरांनी त्यांच्या ह्या असाधारण कार्याचे कौतूक केले व बडोदाच्या राजाने त्यांना पुरस्कार देवून सन्मानित केले. अशी माहिती बडोद्याच्या राजघराण्यातील दस्ताऐवजांमध्ये आपल्याला मिळते. परंतू ब्रिटीशांनी कै. शिवशंकर तळपदे यांच्या या अलौकीक कार्याकडे दुर्लक्ष केले फक्त आठ वर्षानंतर इ.स. १९०३ ला पहिला वायुयान (विमान) उडवल्याचे श्रेय राईट बंधूंना दिले.

८. **राजा भोज चे निधन —** गांगेयदेवाचा मुलगा कर्णदेव याने चालुक्य राजा भीम याच्यासोबत मिळून इ.स. १०५५ मध्ये मालवा वर आक्रमण केले. धारानगरी शंत्रुनी लुटली, भोज म्हातारा झाला होता व गंभीर आजारी होता. यातच राजा भोज चा मृत्यु आषाढ वदि १३, संवत ११११३ (१०५५ई.) ला झाला. मालवा उध्वस्त झाला. याप्रमाणे महान सम्राट भोज यांचा जीवनकाळ वयाच्या ७५—७६ वर्षात संपला. राजकवी दशवल लिखित "चिंतामणीसार्णि" अनुसार भोज ने मालव्यावर १००० ते १०५५ ई. पर्यंत सतत ५५ वर्ष, ६ महिने ३ दिवस पर्यंत राज्य केले व त्यांचा काळ भारताचा "**स्वर्णयुग**" म्हणून इतिहासात अजरामर झाले.

(मराठी भाषांतर — सौ. अमिता रवींद्रकुमार टेंभरे, नागपूर)

,,,,

# राजा भोज यांचा थोडक्यात जीवन परीचय

| | |
|---|---|
| जन्मतिथी | : माघ (वसंत) पंचमी,संवत १०३७ (९८०ई.) |
| नामघोष | : परमभद्दारक, महाराजाधिराज परमेश्वर श्री भोजदेव |
| क्षात्रकुळ | : अग्निवंशीय, क्षत्रियपवार जान, परमार राजवंश |
| कुलदैवत | : जगनारायण, शिव, महामाया कालिका वाग्देवी (महामाया, महासरस्वती) |
| राज्य,राजधानी | : मालवा, राजधानी — धार |
| देवकप्रतीक | : तलवारीची धार |
| सिंहासनछत्र | : लाल |
| गोत्र व मंत्र | : वशिष्ठ, गायत्री |
| यज्ञ | : अग्निपलक शैवधर्मी |
| माता—पिता | : सावित्रीदेवी, पिता — मालवाधिश राजा सिंधुलदेवराज |
| पत्नीया | : लिलावती (महाराणी), सत्यवती, मदनमंजीरी, भानुमती, पिंगला, सुभद्रा. |
| मुले—मुली | : जयसिंह, देवराज, वत्सराज, अभयचंद्र, भीमसेन, उदयदत्त. |
| मुली | : राजमती, भानुमती |
| राज्याभिषेक | : मार्गशिष दशमी, सवंत १०५६(१००० इ.स.) |
| चक्रवर्ती पदग्रहण | ा: विजयादशमी सवंत १९७८ (१०२१ इ.स.) |
| पदवी ग्रहण | : मालव सम्राट परमभद्दारक महाराजाधीराज परमेश्वर त्रिभुवन चक्रवर्ती |
| साम्राज्य | : उत्तर — हिमालय (काश्मिर), दक्षिण — मलय (केरळ), पूर्व बंगाल (गंगासागर) पश्चिम — द्वारका(गुजरात) |
| प्रमुख विश्वासू प्रधानमंत्री | : रोहक, गृहमंत्री बुद्धीसागर, सेनापती कुलचक्र |
| सुरादित्य | : राजपुरोहीत चंद्रशेखर दीक्षित, महाकवी पंडित छित्रप (कालिदास) |
| विजयी लढाया | : चेदीश्वर, इंद्रस्थ, भीम, तोग्गल, चालुक्य, कर्नाट, लाट, तुरळ, गांगेयदेव, महमूद गजनी, इत्यादी. |
| साहित्य रचना | : ८४ ग्रंथ |
| आठवणी | : भोजशाला, सोमनाथ मंदिर, केदारेश्वर मंदिर, भोज मंदिर, भोजताल (भोजझील) पापसुदन कुंड, (काश्मिर काटेर) कपटेश्वर महादेव, भोज लाट महाल )लाट मस्जीद) इत्यादी. |
| मृत्युतिथी | : आषाढ त्रयोदशी संवंत १११२ (ई.स.१०५५) |